201407251244564408

सतत तीन वर्षे 'ड' दर्जा प्राप्त संस्थांवर कारवाई करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक आयटीआय १००५/(२८१/०५)/व्यशि-२,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १४ सप्टेंबर, २००५.

संदर्भ : १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. आयटीआय १०००/(१८२/००)/व्यशि-२, दिनांक २० जानेवारी, २००१.
२) संचालक(प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, यांचे क्र. १२/एएफएन/२००५/(२०)/३६७, दि. ११.७.२००५ चे पत्र.
३) शासनाचे क्रमांक पीटीआय १००२/(३०४)/व्यशि-२, दि. २७.६.२००३ चे पत्र.

**प्रस्तावना :** राज्यातील खाजगी औद्योगिक प्रशिक्षण केंद्रांमधून दिल्या जाणा-या प्रशिक्षणाचा दर्जा चांगला रहावा, त्यांच्यामध्ये गुणवत्ता वाढीची निकोप स्पर्धा वाढीस लागावी, संस्थेच्या गुणवत्तेचा नेमका दर्जा समाजाला माहित व्हावा, निकृष्ट संस्थांना पायबंद व उत्कृष्ट संस्थांना उत्तेजन मिळावे, या उद्देशाने शासनाच्या संदर्भ क्रमांक १ मधील दिनांक २० जानेवारी, २००१ च्या शासन निर्णयानुसार राज्यातील अशासकीय औद्योगिक प्रशिक्षण केंद्रांचे दर्जानिहाय 'अ', 'ब', 'क' व 'ड' असे वर्गीकरण करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

तसेच, सदर शासन निर्णयाच्या निकषानुसार प्रशिक्षणाची गुणवत्ता न राखणा-या विशेषत: 'ड' वर्गातील संस्थांवर शासन निर्णयातील परिच्छेद-५ नुसार कारवाई करण्याचे निर्देश दिलेले आहेत.

त्याप्रमाणे संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भ क्रमांक २ मधील प्रस्तावानुसार सन २००२-०३ ते २००४-०५ या कालावधीत सतत दोन वर्षे 'ड' दर्जा प्राप्त केलेल्या एकूण २३ संस्थांपैकी तिस-या वर्षीदेखील ज्या १३ संस्थांना 'ड' दर्जा प्राप्त झाला आहे, अशा संस्थांना सन २००५ करिता शासन निर्णयानुसार मान्यता रद्द करण्याची कारवाई करण्याचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला होता. सदरहू प्रस्तावानुसार संचालकांनी प्रस्तावित केलेल्या 'ड' दर्जा प्राप्त संस्थांवर शासन निर्णयातील निकषानुसार कारवाई करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :** वरील प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार व संचालकांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे या शासन निर्णयासोबतच्या प्रपत्र 'अ' मधील नमूद केलेल्या सतत तीन वर्षे 'ड' दर्जा प्राप्त केलेल्या १३ औद्योगिक प्रशिक्षण केंद्रांना पुढीलप्रमाणे कारवाई करण्याचे शासन आदेश देण्यात येत आहेत.

(१) संदर्भ क्रमांक ३ मधील शासन पत्रानुसार यापूर्वी अन्य संस्थांवर करण्यात आलेल्या आर्थिक दंडात्मक कारवाईप्रमाणे (रु. १०,०००/-) प्रपत्र 'अ' मधील सदर १३ संस्थांवर देखील आर्थिक दंडात्मक कारवाई करण्यात यावी.

(कृपया मागे पहा.)



92

167

(२) वरील (१)मधील कारवाई ही सदर संस्थांना त्यांच्या दर्जात पुढील शैक्षणिक वर्षापर्यंत (२००६ पर्यंत) सुधारणा करण्याची संधी असून या संधीच्या कालावधीत सदर १३ संस्थांपैकी पुढील शैक्षणिक वर्षी ज्या संस्था आपल्या दर्जात सुधारणा करणार नाहीत, त्यांना पुढील टप्प्याची कारवाई म्हणून निरीक्षणाअंती प्रवेशक्षमता कमी करण्यात येईल.

(३) त्यानंतर देखील पुढील निरीक्षणाअंती सदर १३ संस्थांच्या दर्जात सुधारणा न झाल्यास अंतिम कारवाई म्हणून संस्थेची मान्यता रद्द करण्याचा शासन गांभीर्याने विचार करील.

(४) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी वरीलप्रमाणे योग्य ती नोंद घेऊन व संस्थांना कळवून पुढील कारवाई त्वरित करावी.

(५) तसेच, पुढील निरीक्षणाअंती शासन निर्णयाच्या निकषानुसार वरील मुद्दा क्रमांक २ व ३ नुसार योग्य तो प्रस्ताव शासनास सादर करण्याची कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(श्या. र. चोरे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
उप संचालक , व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई / पुणे / नागपूर / औरंगाबाद / अमरावती / नाशिक .
जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, सर्व जिल्हे.
प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण केंद्र (प्रपत्र-अ प्रमाणे).
निवडनस्ती/व्याशि-२

C:\My Documents\VE-1\GR\Classification.doc

168